एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-२ अंतर्गत परिवीक्षाधीन तहसीलदार यांना महसुली विभाग वाटप करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र.ससेनि-२५१७/प्र.क्र.४३/ई-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांकः- १२ मे, २०१७

संदर्भ :

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.१.२०१४
२. शासन अधिसचूना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-०५१४/प्र.क्र.२०/१८-ब, दि.०७.११.२०१५
३. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या.१२, दि.२८.४.२०१५
४. शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, टिआरएन ०३१५/प्र.क्र.३४/१५/१८-ब(२), दि. ०६.०६.२०१५
५. शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, टिआरएन ०३१५/प्र.क्र.३४/१५/१८-ब(२), दि. १०.०८.२०१५
६. शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र.ससेनि-२५१५/प्र.क्र.११४/ई-३, दि. ०९.१०.२०१५ व दि.१७.१०.२०१५
७. शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, टिआरएन ०४१७/प्र.क्र.१३/सीपीटीपी-अ, दि. ०३.५.२०१७

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने राज्यसेवा परीक्षा-२०१४ च्या अंतिम निकालाच्या आधारावर शिफारस केलेल्या परिवीक्षाधीन तहसीलदार (गट-अ) उमेदवारांचे संदर्भाधीन क्रमांक १ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयानुसार एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण (सीपीटीपी-II) दिनांक ०२.५.२०१५ रोजी सुरु करण्यात आले व सदर प्रशिक्षण दिनांक ३०.४.२०१७ रोजी पूर्ण झाले आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या दिनांक ३.५.२०१७ च्या पत्रान्वये (संदर्भ क्रमांक-७) तहसीलदार गट-अ या सवंर्गातील उमेदवारांना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या परीक्षेत आणि मुलाखतीमध्ये प्राप्त झालेले गुण आणि परिवीक्षा कालावधीतील २०० गुणांपैकी प्राप्त झालेले गुण एकत्रित करुन परिवीक्षाधीन तहसीलदार (गट-अ) यांची तात्पुरती ज्येष्ठता निश्चित करुन त्यांना महसुली विभाग वाटप व पदस्थापना देणेबाबत शिफारस केली आहे.

३. "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५" **अनुसार** एकत्रित (परिवीक्षाधीन प्रशिक्षण-२) (सीपीटीपी-II) अंतर्गत प्रशिक्षण घेतलेल्या ३१ परिवीक्षाधीन तहसीलदार (गट-अ) यांना पुढील प्रमाणे महसुली विभागाचे वाटप करण्यात येत आहे.

| अ. क्र. | सा.प्र.वि. ने निश्चित केलेला क्र. | नाव | वाटप करण्यात आलेला महसूली विभाग |
|---|---|---|---|
| १ | १ | श्री.अंडिल कैलास परमेश्वर | नागपूर |
| २ | २ | श्री.देऊळगांवकर आनंद बाबुराव | अमरावती |
| ३ | ३ | श्री. सुरेश विठ्ठलराव शेजुल | औरंगाबाद |
| ४ | ४ | श्री.पाटील उमेश शिवाजीराव | नाशिक |
| ५ | ५ | श्री.थेटे सतिश आप्पासाहेब | नागपूर |
| ६ | ६ | श्री.मगर शिवाजी रामेश्वरराव | अमरावती |
| ७ | ७ | श्री.राजपुरे संदिप अशोक | औरंगाबाद |
| ८ | ८ | श्री.चंद्रे योगेश विठ्ठल | नाशिक |
| ९ | ९ | श्री.बेडसे प्रशांत सुभाष | नागपूर |
| १० | १० | श्री.शेलार अरुण जोतिराम | अमरावती |
| ११ | ११ | श्री.पवार स्वप्निल विठ्ठलराव | औरंगाबाद |
| १२ | १२ | श्री.इंगळे जितेंद्र मारुती | नाशिक |
| १३ | १३ | श्रीमती पाटील तेजस्विनी मारूती | नागपूर |
| १४ | १४ | श्री.पाटील औदुंबर शामराव | अमरावती |
| १५ | १५ | श्री.देशमुख नरेंद्र तबाजी | औरंगाबाद |
| १६ | १६ | श्री.शेख मोहमद फसियोद्दिन मोहमद रफियोद | नाशिक |
| १७ | १७ | श्री.कांबळे अनिरुध्द श्रीपती | नागपूर |
| १८ | १८ | श्री.चव्हाण सुनिल बाबुराव | अमरावती |
| १९ | १९ | श्री.लंगुटे सचिन विश्वास (दिव्यांग प्रवर्गातून निवड असल्यामुळे त्यांचा पसंतीचा विभाग) | पुणे विभाग |
| २० | २० | श्रीमती डामरे अश्विनी दिगंबर | औरंगाबाद |
| २१ | २१ | श्रीमती रचना मुरलीधर पवार | नाशिक |
| २२ | २२ | श्रीमती पल्लवी मच्छिंद्र टेमकर | नागपूर |
| २३ | २३ | श्रीमती महंदुले प्रज्ञा भास्कर | अमरावती |
| २४ | २४ | श्रीमती योगिता सहदेव कोल्हे | औरंगाबाद |
| २५ | २५ | श्रीमती संचेती श्वेता चंदनमल | नाशिक |
| २६ | २६ | श्रीमती मकवाने रोषन सुभाष | नागपूर |
| २७ | २७ | श्री.पोवार अमोल नंदकुमार | अमरावती |
| २८ | २८ | श्रीमती पुजारी शोभा मारुती | औरंगाबाद |
| २९ | २९ | श्रीमती श्वेता शशिकांत पाटोळे | नाशिक |
| ३० | ३० | श्री.जसवंत रमेश बाबुराव | नागपूर |
| ३१ | ३१ | श्रीमती वाणी शितल बापुराव | अमरावती |

४. उपरोक्त तक्त्यातील उमेदवारांची सेवाज्येष्ठता निश्चित करताना खालील बाबींचाही विचार करण्यात आला आहे:-

(i) सदर ज्येष्ठतेमध्ये, ज्या उमेदवारांनी परिवीक्षा कालावधीत अपरिहार्य कारणास्तव (प्रसुती रजा/ वैद्यकीय कारण इ.) दीर्घ रजा उपभोगलेली आहे, त्यांच्या रजेच्या कालावधीत मूल्यांकनाचा विचार करण्यात आला नाही.

(ii) महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत श्री. रमेश जसवंत(ज्येष्ठता क्रमांक-३०) यांची "अनुसूचित जमाती" या प्रवर्गातून शिफारस करण्यात आली. त्यांचे जात प्रमाणपत्र/ वैधता प्रमाणपत्र पडताळणी करण्यसाठी आदिवासी विकास विभागास प्रस्ताव सादर केला असता, आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था यांनी केलेल्या शिफारशीनुसार त्यांना एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी देण्यात आलेल्या तात्पुरत्या नियुक्तीचे पत्र पुढील आदेश होईपर्यंत स्थगित ठेवण्यात आले होते. या स्थगिती आदेशाविरोधात मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र. ५१८४/२०१५, क्र. ५७०३/२०१५ व ५९५८/२०१५ दाखल करण्यात आल्या आहेत. मा. न्यायालयाने त्यांच्या तात्पुरत्या नियुक्तीच्या पत्राला देण्यात आलेली स्थगिती उठविली. सबब, त्यांना दि. ०८.७.२०१५ च्या पत्रान्वये सीपीटीपी-२ मध्ये परिवीक्षाधीन प्रशिक्षणास अनिवार्य संलग्नतेच्या चालू असलेल्या टप्प्यावर रुजू करुन घेण्याच्या सूचना दिल्या होत्या. श्री.रमेश जसवंत हे प्रशिक्षणाच्या टप्प्यात विलंबाने रुजू झाले. पर्यायाने त्यांनी प्रशिक्षण न घेतलेल्या टप्प्यांचे गुण अंतिम ज्येष्ठतेसाठी विचारात न घेतल्यामुळे त्यांचे गुण कमी दर्शविण्यात आलेले आहेत. भविष्यात श्री.रमेश जसवंत यांनी प्रशिक्षणाचे उर्वरित टप्पे पूर्ण केल्यानंतर या टप्प्यांचे गुण त्यांच्या एकूण गुणांमध्ये समाविष्ट करणे आवश्यक आहे. या गुणांच्या समावेशानंतर दिनांक ३.५.२०१७ रोजीच्या पत्रान्वये दर्शविण्यात आलेल्या सेवाज्येष्ठतेत बदल होणार आहे. असे असले तरी श्री.जसवंत यांच्या महसुली विभाग वाटपात बदल होणार नाही.

(iii) सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-५ येथील दिनांक १०.८.२०१५ च्या कार्यालयीन आदेशान्वये गट-अ संवर्गातील सीपीटीपी-१ मध्ये प्रशिक्षण घेतलेल्या काही प्रशिक्षणार्थींची राज्यसेवा परीक्षा-२०१४ अन्वये गट-अ मधीलच अन्य पदावर निवड झाली आहे अशा परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना पायाभूत प्रशिक्षण व अनिवार्य संलग्नता या प्रशिक्षणाच्या टप्प्यातून सूट देण्यात आली आहे, सबब सुट मिळालेल्या टप्प्यांचे सीपीटीपी-१ च्या तुकडीतील गुणच सेवाजेष्ठतेसाठी गृहीत धरले आहेत.

४. परिवीक्षाधीन तहसीलदार यांची नियुक्ती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहील:-

i) सदर ज्येष्ठता तात्पुरती ज्येष्ठता म्हणून मान्य करण्यात आली आहे. या तात्पुरत्या ज्येष्ठता यादीतील क्रमांकानुसार अधिकाऱ्यांना शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग दिनांक २८.४.२०१५ मधील तरतूदींनुसार विभागीय संवर्ग वाटप करण्यात येत

आहे. ज्येष्ठता यादी अंतिम केल्यानंतर बदललेल्या स्थानानुसार संवर्ग वाटप बदलणार नाही.

ii) संबधित उमेदवारांना नियमाप्रमाणे प्रादेशिक भाषा व हिंदी भाषा परीक्षा विहित मुदतीत उत्तीर्ण व्हावी लागेल.

iii) संबधित उमेदवारांना तहसीलदार सेवाप्रवेश नियमानुसार राज्यातील महसूल विभागात नियुक्ती देण्यात आलेली आहे. सदर नियुक्तीचा विभाग कोणत्याही परिस्थितीत बदलून देण्यात येणार नाही. तसेच कोणत्याही प्रकारचा राजकीय दबाव आणल्यास सदर कृती महाराष्ट्र नागरी सेवा(वर्तणूक)नियम,१९७९ नुसार शिस्तभंग ठरेल व संबधिताविरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

५. परिवीक्षाधीन तहसीलदार यांना परिच्छेद ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे महसूली विभाग संवर्ग वाटप करण्यात येत आहे. त्यांचे पदस्थापनेचे आदेश शासन स्तरावरुन स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. तदनंतर सदर परिवीक्षाधीन तहसीलदार यांना कार्यमुक्त करणे व पदस्थापना देण्यात आलेल्या पदावर रुजू करण्याबाबतची कार्यवाही संबधित विभागीय आयुक्तांनी करावी. विभागीय आयुक्तांनी कार्यमुक्त केल्यावर जे उमेदवार रुजु होणार नाहीत त्यांचेवर शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५१२१५०६५५४३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Manik Abaji Gutte

Digitally signed by Manik Abaji Gutte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e916069df1a7a7a7d07024f4508c2ec1a57df269bc3fbc07593501473a9fdecc, cn=Manik Abaji Gutte
Date: 2017.05.15 15:17:30 +05'30'

**(मा. आ. गुट्टे)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

सर्व विभागीय आयुक्त.

प्रतिलिपी,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई (पत्राने)

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

४. महासंचालक, यशदा, राजभवन कॉम्प्लेक्स, बाणेर रोड, पुणे

५. मा.मुख्य सचिव, यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई

६. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई

७. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई

८. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर

९. सर्व जिल्हाधिकारी

१०.मा.प्रधान सचिव(महसुल ) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई

११.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)

१२.उपसचिव (प्रशिक्षण), सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन १८-ब), मंत्रालय, मुंबई

१३.संबंधित परिवीक्षाधीन तहसीलदार (विभागीय आयुक्त यांचे मार्फत)

१४.अवर सचिव (ई-४/ई-२), कक्ष अधिकारी (ई-१/ई-१अ), महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई

१५.कार्यासन ई-३, निवडनस्ती, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई